सन २०१८-१९ करीता आदिवासी संशोधन संस्थांना सहाय्य या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडील प्राप्त निधी वितरणास मान्यता देण्याबाबत (पहिला हफ्ता)

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः - आसंप्र ३४१८/प्र.क्र.१५९/का.-०५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**तारीख: ११ जानेवारी, २०१९**

**वाचा :-**

1) **जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०३१/१५/२०१८-Grants, दि.२६/०६/२०१८. (२ पत्रे)**
2) **आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.आसंप्र ३४१८/प्र.क्र.१५९/का-०५, दि. २७/०८/२०१८**

**प्रस्तावना:-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता आदिवासी संशोधन संस्थांना सहाय्य या योजनेंतर्गत केंद्र शासनास प्रस्ताव सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावांच्या अनुषंगाने जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली येथे प्रकल्प मुल्यमापन समितीची (Project Appraisal Committee-PAC) बैठक दि. २३/०५/२०१८ रोजी आयोजित करण्यात आलेली होती. या बैठकीच्या वाचा मधील इतिवृत्तान्वये केंद्र शासनाने एकुण रु. ४८५.०१ लक्ष निधीच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान केलेली आहे. यापैकी केंद्र शासनाने वाचा मधील पत्रान्वये रु. ३८८.०० लक्ष निधी ८०% च्या प्रमाणात पहील्या हफ्त्याच्या स्वरूपात वितरीत केला आहे. आता सदर रु. ३८८.०० लक्ष इतका निधी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने आदिवासी संशोधन संस्थांना सहाय्य या योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता वितरीत केलेला एकूण रु. ३८८.०० लक्ष (रु. तीन कोटी अठ्ठ्यांशी लक्ष रूपये फक्त) निधी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना खालील कामांकरीता स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या निधीच्या मर्यादेत खर्च करण्यास तसेच निधी वितरित करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र | मंजूर योजनेचे नाव | मंजूर करण्यात आलेला निधी (रू. लाखात) | वितरित करण्यात येणारा निधी (रू.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | • Virtual Museum at TRTI, Pune.<br>• VR films shoot location in Maharashtra (finak IVR film will be approx. ४-५ min duration each). Tribal Museum scan (scan points २००).<br>• Tagging of museum artifacts in the tribal museum scan<br>• Kiosks.<br>• Gear VR and smart phones.<br>• Training.<br>• Training allowances | ८०.४० | ६४.०० |
| २ | Construction of Dome in the premises of TRTI, Pune | ९८.५३ | ७९.०० |
| ३ | Tribal Art Gallery at Pune Airport | १७.०८ | १४.०० |
| ४ | Organizing PO wise tribal dance and culture festival | १३४.०० | १०७.०० |
| ५ | Developing primers in major languages | १०.०० | ८.०० |
| ६ | Research and documentation on traditional medical system and healing practices amongst communities | ७०.०० | ५६.०० |
| ७ | Dictionary of ३ tribal dialects | ५०.०० | ४०.०० |
| ८ | Impact Assessment of CFR right and Evaluation study of utilization of State TSP funds and Central Ministries / Departments STC Funds in the State | २५.०० | २०.०० |
| | Total | ४८५.०१ | ३८८.०० |

२. उपरोक्त रु.३८८.०० लक्ष (रु. तीन कोटी अठ्ठ्यांशी लक्ष रूपये फक्त) चा खर्च मागणी मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागसवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२) जनजाति क्षेत्राबाहेरील उपाययोजना (०२) (०२) नियोजन व सनियंत्रण शाखा जनजाति संशोधन व प्रशिक्षण संस्था (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर),२२२५१८६७ याखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी वितरित निधीच्या मर्यादेत खर्च करावे. व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**४. या संदर्भात वाचा येथील अ.क्र.२ मधील शासन निर्णय या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.**

**५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०२/१८/ अर्थ-१९, दिनांक २४/१२/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.**

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९०११४१४४०२३०३२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Santosh Shivaji Jadhav

Digitally signed by Santosh Shivaji Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f635bf4a671627c02b82e6a01acb4a38afc24f58a5534a9d1271fe258a564b0, serialNumber=b8ee819ccc335cea98640b72c63671dd013899d3601f09ce4ea340e1741652a0, cn=Santosh Shivaji Jadhav
Date: 2019.01.14 14:50:26 +05'30'

**(संतोष जाधव)**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६. अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अवर सचिव/कार्यासन अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (का०५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.